मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष - २२०३, तंत्रशिक्षण या लेखाशिर्षाखाली ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर) वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१५२१/(प्र.क्र.१७७/२१)/तांशि-३,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक:-१० नोव्हेंबर, २०२१.

संदर्भ:-

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.प्रशामा-२०१३/प्र.क.०३/१३/तांशि-३, दि.१८ मार्च, २०१३.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१.
४) संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र.९/तंशि/२०२०/३८१, दि.३० सप्टेंबर, २०२१.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१.

**शासन ज्ञापन:-**

वार्षिक योजना २०२१-२२ मध्ये तंत्रशिक्षण संचालनालयास अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्थांना सहाय्य -२२०३ ०१९४ या योजनेकरीता रु.५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. संचालक तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.३० सप्टेंबर, २०२१ च्या पत्रान्वये सदर योजनेतंर्गत येणाऱ्या वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था (व्ही.जे.टी.आय.), मुंबई या संस्थेतील पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह इमारतीच्या बांधकामासाठी रु.११.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यासाठी प्रस्ताव सादर केला आहे. त्यास अनुसरुन सदर योजनेसाठी सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पित झालेल्या रु.५०.०० कोटी इतक्या निधीच्या ५० टक्केच्या मर्यादेत रु.११.०० कोटी (रुपये अकरा कोटी फक्त) इतके सहायक अनुदान कोषागारातून आंहरीत व वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. व्ही.जे.टी.आय.,मुंबई या संस्थेच्या बांधकामासाठी आतापर्यंत दिलेल्या व आता वितरित करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे दर्शविण्यात येत आहे:-

(रुपये लाखात)

| कामाचे नांव | प्रशासकीय मान्यतेनुसार अंदाजित खर्च | मार्च-२१ पर्यंत दिलेला निधी | वितरीत करावयाचा शिल्लक निधी | २०२१-२२ मध्ये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| व्ही.जे.टी.आय. मुंबई येथील पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह इमारतीचे बांधकाम. | ३४५२.४० | ११७९.७९ | २२७२.६१ | ११००.०० |

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४ ऑक्टोबर, २०२१ च्या परिपत्रकानुसार आवश्यक असलेल्या बाबींचा तपशील पुढीलप्रमाणे:-

| अ.क्र. | तपासणी बाबतचा तपशील | अभिप्राय |
|---|---|---|
| १ | विभागास प्रदान वित्तीय अधिकार. | शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.६ एप्रिल, २०२१ व दि.२४ जून, २०२१ व दि.१४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्रशासकीय विभागास अधिकार. |
| २ | मंजूर निधी | सन २०२१-२२ मध्ये रु.५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित झालेला आहे. |
| ३ | मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे काय? | सन २०२०-२१ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. |
| ४ | ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षित देयक प्रलंबित नाही. | या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |
| ५ | स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे. | संबंधित नाही. |
| ६ | वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे. | संबंधित नाही. |
| ७ | बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-यांची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.प्रशामा-२०१३/प्र.क.०३/१३/तांशि-३, दि.१८ मार्च, २०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. |
| ८ | अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमीत करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत. | संबंधित नाही. |
| ९ | खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/उद्योग-४, दि.१ डिसेंबर, २०१६ च्या शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा. | संबंधित नाही. |
| १० | साहित्य खदेदीची रक्कम पुरवठादारांच्या नांवे ECS व्दारे आहरित करावी. | संबंधित नाही. |

४. सदरहु खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३, २२०३-तंत्रशिक्षण, १०४, अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्था यांना सहाय्य (०२) परिरक्षण अनुदान, (०२)(०३)- अभियांत्रिकी महाविद्यालये (कार्यक्रम)

(२२०३ ०१९४), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू निधी वितरीत करण्यासाठी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व लेखा अधिकारी, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६. सदर संस्थेस चालू वर्षी दिलेल्या व यापूर्वी दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालकांनी प्राप्त करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

७. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३११/१४७१, दि.२० ऑक्टोबर, २०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९४७/२०२१/व्यय-५, दि.२५ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक २०२१११११०१५२७१९८००८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, pseudonym=34C820519ED3F7F8CB68C7CFB30E405DBAB491DD, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2021.11.11 16:05:17 +05'30'

**(मनाली सामंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
४. संबंधित संस्था (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. नियोजन विभाग /वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
७. कार्यासन साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/तांशि-३.